**केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री किसान सन्मान निधी (PM-KISAN) राज्यात राबविण्यास मान्यता देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र. किसयो-२०१९/प्र.क्र.२०/भाग-४/११-अे,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- १५ फेब्रुवारी, २०१९

**संदर्भ :-** १. केंद्र शासनाच्या सचिव, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय भारत सरकार, यांचे पत्र क्र.एफ नं.१-१/२०१९-क्रेडिट.१, दि.०१.०२.२०१९.
२. **शासन परिपत्रक क्र.किसयो**-२०१९/प्र.क्र.२०/११-अे, दि.०४.०२.२०१९
३. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचना
४. सचिव (कृषि) यांचे पत्र क्र.किसयो-२०१९/प्र.क्र.२०/११-अे, दि.०९.०२.२०१९

**प्रस्तावना :-**

शेतकऱ्यांना निश्चित उत्पन्न मिळण्याकरीता केंद्र शासनाने **प्रधानमंत्री किसान सन्मान निधी (PM-KISAN) योजना** सुरू केली आहे.सदर योजना केंद्र शासनाने विहित केलेल्या निकषांनुसार आणि यासंदर्भात वेळोवेळी केंद्र शासनाकडून प्राप्त होणाऱ्या निदेशाप्रमाणे राज्यात राबविण्यास मंत्रीमंडळाच्या दि.०४.०२.२०१९ रोजीच्या बैठकीमध्ये मान्यता प्रदान करण्यात आली. त्यास अनुसरुन सदर शासन निर्णय निर्गमित करावयाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१) अल्प व अत्यल्प भूधारक शेतकऱ्यांचे उत्पन्न वाढविण्यासाठी केंद्र शासनाने सुरु केलेली १०० टक्के केंद्र पुरस्कृत **प्रधानमंत्री किसान सन्मान निधी (PM-KISAN) योजना** राज्यात दि.०१.१२.२०१८ पासून राबविण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२) सदर योजनेंतर्गत विहित निकषांप्रमाणे ज्या कुटुंबाचे (पती-पत्नी व त्यांचे १८ वर्षाखालील अपत्य) दि.०१.०२.२०१९ पर्यंतचे सर्व ठिकाणचे मिळून लागवडीलायक एकुण धारण क्षेत्र २ हेक्टर पर्यंत असेल अशा पात्र शेतकरी कुटुंबियांस रु.२०००/- प्रती हप्ता याप्रमाणे तीन हप्त्यात एकुण रु.६०००/- प्रतीवर्ष लाभ अनुज्ञेय असेल.

३) या योजनेची अंमलबजावणी दि.०१.१२.२०१८ पासून करण्यात येत असून याकरीता दि. ०१.०२.२०१९ पर्यत संबंधित खातेदार शेतकरी कुटुंबियांच्या नावे असलेली जमिन धारणा विचारात घेउन प्रथम हप्ता हा दि.०१.१२.२०१८ ते दि.३१.०३.२०१९ या कालावधीकरीता अनुज्ञेय असेल.

४) सदर योजनेसाठी लाभार्थ्यांना द्यावयाच्या लाभाची गणना केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या सविस्तर मार्गदर्शक सुचनांमधील परिच्छेद क्र. ३.२ व परिशिष्ट १ नुसार करण्यात यावी. तसेच सदर योजनेसाठीच्या लाभाच्या अनुषंगाने केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या सविस्तर

मार्गदर्शक सुचनांमधील परिच्छेद क्र. ३.३ व ३.४ मध्ये नमूद केल्यानुसार कार्यवाही करण्यात यावी.

५) सदर योजनेचा लाभ मिळण्यासाठी खालील व्यक्ती पात्र असणार नाहीत -

१) जमिन धारण करणारी संस्था

२) संवैधानिक पद धारण करणारे/ केलेले आजी व माजी व्यक्ती

३) आजी/माजी मंत्री/राज्यमंत्री, आजी/ माजी खासदार/राज्यसभा सदस्य, आजी/ माजी विधानसभा/विधान परिषद सदस्य, आजी/माजी महानगरपालिकेचे महापौर, आजी/माजी जिल्हा परिषदेचे अध्यक्ष

४) केंद्र व राज्य शासनाचे सर्व कार्यरत व निवृत्त अधिकारी/ कर्मचारी, शासन अंगीकृत निमशासकीय संस्थांच्या अखत्यारितील कार्यालयांमधील आणि स्वायत्त संस्थांचे सर्व अधिकारी /कर्मचारी तसेच स्थानिक स्वराज संस्थांमधील नियमित अधिकारी/ कर्मचारी (चतुर्थश्रेणी/ गट-ड वर्गातील कर्मचारी)

५) मागील वर्षात आयकर भरलेल्या व्यक्ती.

६) निवृत्तीवेतनधारक व्यक्ती ज्यांचे मासिक निवृत्तीवेतन रु.१० हजार किंवा त्यापेक्षा जास्त आहे.(चतुर्थश्रेणी/ गट-ड वर्गातील कर्मचारी)

७) नोंदणीकृत व्यवसायिक डॉक्टर, वकील, अभियंता, सनदी लेखापाल (चार्टर्ड अकाऊटंट), वास्तुशास्त्रज्ञ (आर्किटेक्ट), इत्यादी क्षेत्रातील व्यक्ती.

**६) योजनेची अंमलबजावणी :-**

संदर्भ क्र. २ चे परिपत्रक, तद्नंतर केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सुचना व संदर्भ क्र. ४ चे पत्र विचारात घेवून, योजनेसाठी पात्र लाभार्थ्यांची यादी तयार करण्यात यावी व त्यानुसार अंमलबजावणी करण्यात यावी. योजनेसाठी लाभार्थ्यांना द्यावयाच्या लाभाची गणना केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या सविस्तर मार्गदर्शक सुचनांमधील परिच्छेद क्र. ३.२ व परिशिष्ट १ नुसार करण्यात यावी.

**७) अंमलबजावणी करणेसाठी संनियंत्रण समित्या :-**

वरील कार्यपद्धतीची प्रभावीपणे अंमलबजावणी करणेसाठी खालील प्रमाणे राज्यस्तर, जिल्हास्तर, तालुकास्तर व ग्रामस्तरावर सनियंत्रण समित्या गठीत करणेत येत आहेत.

**अ) <u>राज्यस्तरीय प्रकल्प आढावा समिती:-</u>**

I. मुख्य सचिव - अध्यक्ष

II. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव/ सचिव (महसूल),महसूल व वन विभाग - सदस्य

III. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव/ सचिव (माहीती व तंत्रज्ञान),सामान्य प्रशासन विभाग- सदस्य

IV. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव/ सचिव (कृषि),कृषि व पदूम विभाग- सदस्य

V. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे

VI. आयुक्त (जमाबंदी), पुणे

VII. राज्य सूचना विज्ञान अधिकारी (NIC) मुंबई

VIII. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाऑनलाईन

IX. सेंट्रल बँक ऑफ इंडिया चे प्रतिनिधी
X. उप सचिव, कृषि व पदूम विभाग, मंत्रालय, मुंबई

**राज्यस्तरीय प्रकल्प आढावा समितीची कार्य व जबाबदारी :-**

I. सदर योजनेशी संबंधीत सर्व विभागांमध्ये समन्वय घडवून आणणे.
II. योजनेच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने कालबध्द आढावा घेणे.
III. केंद्र शासन व राज्य शासन यांच्यातील समन्वयाची भूमिका बजावणे.

**(ब) राज्यस्तरावरील अंमलबजावणी प्रमुख:-**

आयुक्त (कृषि) हे या योजनेचे राज्यस्तरावरील अंमलबजावणी प्रमुख म्हणून काम पाहतील. राज्यस्तरावरील अंमलबजावणी प्रमुखांची कार्य व जबाबदारी :-

I. सदर योजनेसाठीच्या लाभार्थ्यांची यादी अंतीम करुन केंद्र शासनाच्या PM-KISAN Portal (http://pmkisan.nic.in) वर अपलोड (Upload) करण्याची जबाबदारी राज्यस्तरावरील अंमलबजावणी प्रमुखांची राहील.
II. केंद्र शासन व राज्य शासन यांच्यातील समन्वयाची भूमिका बजावणे.
III. अंमलबजावणी यंत्रणेच्या शंकांचे व तक्रारींचे निरसन करणे.

**(क) विभागस्तरावरील प्रमुख अधिकारी / नोडल अधिकारी :-**

विभागीय आयुक्त हे योजनेचे विभागस्तरावरील प्रमुख अधिकारी राहतील. तसेच उपायुक्त (महसूल) हे विभागस्तरावर नोडल अधिकारी म्हणून काम पाहतील. विभागस्तरावरील प्रमुख अधिकारी / नोडल अधिकारी हे अंमलबजावणी यंत्रणेच्या शंकांचे व तक्रारींचे निरसन करतील.

**ड) जिल्हास्तरीय समिती :-**

i. जिल्हाधिकारी -अध्यक्ष
ii. मुख्य कार्यकारी अधिकारी - सदस्य
iii. जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी - सदस्य
iv. डीस्ट्रीक्ट डोमेन एक्स्पर्ट (DILRMP) - सदस्य
v. निवासी उप-जिल्हाधिकारी - समन्वय अधिकारी तथा जिल्हास्तरीय नोडल अधिकारी
vi. जिल्हा उप निबंधक सहकारी संस्था- सदस्य
vii. जिल्हा अग्रणी बँक अधिकारी -सदस्य.

**जिल्हास्तरीय समितीची कार्य व जबाबदारी :-**

I. या योजनेस व्यापक प्रसिद्धी देणे.
II. तालुकास्तरीय व क्षेत्रीय स्तरावरील अधिकाऱ्यांना व कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण देणे.
III. निश्चित करून देण्यांत आलेल्या कालबद्ध कार्यक्रमानुसार माहिती संकलनाचा दैनंदिन आढावा घेणे.
IV. क्षेत्रीय स्तरावरील प्राप्त होणाऱ्या तक्रारींचे निराकरण करणे.
V. सदर योजनेशी संबंधीत सर्व विभागांमध्ये समन्वय घडवून आणणे.

VI. जिल्हाधिकारी या योजनेचे प्रमुख म्हणून काम पाहतील. तसेच निवासी उपजिल्हाधिकारी हे योजनेचे नोडल अधिकारी असतील.

**इ) तालुकास्तरीय समिती :-**

i. उप विभागीय (प्रांत) अधिकारी - अध्यक्ष
ii. उपविभागीय कृषी अधिकारी - सदस्य
iii. तहसीलदार- समन्वय अधिकारी तथा तालुकास्तरीय नोडल अधिकारी
iv. गटविकास अधिकारी- सदस्य
v. तालुका कृषी अधिकारी- सदस्य
vi. सहाय्यक निबंधक, सहकारी संस्था - सदस्य

**तालुकास्तरीय समितीची कार्य व जबाबदारी :-**

I. ग्रामस्तरावरून प्राप्त झालेल्या तक्रारींचे निराकरण करणे. त्यानुषंगाने तालुकास्तरीय समिती ही तक्रार निवारण समिती म्हणून काम करेल.
II. तालुकास्तरीय समिती ही तालुकास्तरीय विविध विभागांमध्ये या योजनेच्या कार्यान्वयनाच्या दृष्टीने समन्वय साधेल.
III. सर्व ग्राम समित्या कालबद्ध कार्यक्रमानुसार कामकाज करीत असल्याबाबतचा दैनंदिन आढावा तालुकास्तरीय समिती घेईल.
IV. तालुकास्तरीय समितीसाठी तहसिलदार हे योजनेसाठी प्रमुख जबाबदार अधिकारी राहतील.

**ई) ग्रामस्तरीय समिती :-**

i. तलाठी - समिती प्रमुख
ii. ग्रामसेवक / ग्रामविकास अधिकारी - सदस्य
iii. कृषी सहाय्यक - सदस्य
iv. सचिव वि.का.से.स.सो. - सदस्य

**ग्रामस्तरीय समितीची कार्य व जबाबदारी :-**

I. पात्र शेतकरी कुटुंबाची निश्चिती करणे आणि याकरीता राष्ट्रीय भुमी अभिलेख अधुनिकीकरण कार्यक्रम व कृषी गणना २०१५-१६ करीता यापूर्वी उपलब्ध करुन दिलेली माहिती प्राप्त करून परिशिष्ट अ मध्ये दिलेल्या नमुन्यामध्ये नोंद करणे.
II. पात्र शेतकरी कुटुंबांची यादी गावामध्ये प्रसिध्द करणे व हरकतींचे निराकरण करुन यादी निश्चित करणे.
III. सदर योजनेचे गावात व्यापक प्रसिद्धी करून मोहिम स्वरूपात गावातील शेतकऱ्यांचे बँक खाते क्रमांक, आधार क्रमांक, मोबाईल क्रमांक ही माहिती संबंधीतांच्या सहमतीने प्राप्त करून परिशिष्ट अ मध्ये भरणे.
IV. ग्रामपातळीवर ही माहिती संकलीत करण्याची प्रमुख जबाबदारी ही तलाठी यांची असून ग्रामसेवक आणि कृषी सहाय्यक हे वरील कामासाठी पूर्ण सहकार्य करतील.

८) **निधी वितरणाची कार्यपध्दती :-**

प्रकल्प अंमलबजावणी प्रमुखांनी सदर योजनेंतर्गत पात्र लाभार्थ्यांची जिल्हानिहाय यादी प्रमाणित करुन PM-KISAN Portal वर अपलोड केल्यानंतर केंद्र शासनाकडून प्रकल्प अंमलबजावणी यंत्रणेच्या स्तरावरील काल्पनिक (Notional) बँक खात्यामधून थेट हस्तांतरणाव्दारे (DBT) महात्मा गांधी राष्ट्रीय रोजगार हमी योजनेच्या (मनरेगा) धर्तीवर अनुज्ञेय अर्थसहाय्य दुसऱ्या हप्त्यापासून लाभार्थ्यांच्या आधारसंलग्न बँक खात्यात जमा करणे आवश्यक असेल.

९) **प्रकल्प संनियंत्रण कक्ष :-**

- सदर योजनेची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी राज्यस्तरावर (कृषि आयुक्तालय स्तरावर) प्रकल्प संनियंत्रण कक्ष स्थापन करण्यात यावा.
- सदर कक्षाच्या प्रशासकीय खर्चासाठी राज्यस्तरीय अंमलबजावणी यंत्रणेला प्रथम हप्त्यामध्ये राज्यास उपलब्ध होणाऱ्या निधीच्या ०.२५ टक्के आणि त्यापुढील हप्त्यांमध्ये उपलब्ध होणाऱ्या निधीच्या ०.१२५ टक्के निधी केंद्र शासनाकडून उपलब्ध करुन दिला जाईल.

प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१९०२१५१३३०४२०००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Dr.Kiran Patil
Date: 2019.02.15 13:33:35 +05'30'

**( किरण पाटील )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव
३. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी
४. सर्व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी
५. सर्व मा.विधानसभा सदस्य
६. सर्व मा. विधानपरिषद सदस्य
७. मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव,मंत्रालय,मुंबई ३२
८. सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुमविभाग, मंत्रालय, मुंबई ३२
९. अपर मुख्य सचिव (महसूल ), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
१०. अप्पर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

११. अप्पर मुख्य सचिव (वित्त),वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१२. सचिव (माहिती व तंत्रज्ञान), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३. अप्पर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
१५. महासंचालक, माहिती व ज नसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई (५ प्रती ) प्रसिध्दीच्या विनंतीसह
१६. सर्व विभागीय महसूल आयुक्त (कोकण, नाशिक, पुणे, औरंगाबाद, अमरावती, नागपूर)
१७.आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१८. सर्व जिल्हाधिकारी
१९.सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२०.सर्व विभागीय कृषि सहसंचालक
२१.सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
२२.सर्व जिल्हा परिषदांचे जिल्हा कृषि विकास अधिकारी
२३.निवड नस्ती, (११-अे).